अमेरिकेचा झेंडा बनवणारी

# बैट्सी रॉस



अमेरिकेचा झेंडा बनवणारी

# बैट्सी रॉस

मराठी : अश्विनी बर्वे



एलिज़ाबैथ ग्रिस्कॉम चा जन्म 1 जानेवारी १७५२ ला फिलडैल्फिया, पैनसिल्वैनिया मध्ये झाला होता. एलिज़ाबैथ, जिला घरातील सर्वजण बैट्सी म्हणत असत, सैमुयल आणि रैबेक्का च्या सतरा मुलांमधली हे आठवे मुल होते. तिचा परिवार क्वेकर संप्रदायाशी संबंधित होता, हा एक असा संप्रदाय आहे जो साधे शांत जीवन जगण्यावर विश्वास ठेवतो. हे कुटुंब एवढे मोठे होते की घरातील कामासाठी मुलांना सुद्धा आई-वडिलांना मदत करावी लागत असे. क्वेकर समाजातील मुली ज्यासफेद टोप्या घालतात त्या टोप्या शिवून बैटसी कुटुंबाला हातभार लावत असे.



इतर क्वेकर आणि धनिक परिवारातील मुलांबरोबर बैट्सी पण 'फ्रेंड्स" शाळे मध्ये शिकण्यास जात असे. या शाळेत वाचन, लिखाण, अंकगणित, भूगोल आणि इतिहासा या विषयांबरोबरच प्रत्येक विद्यार्थाला रोज चार तास काही ना काम करावे लागत असे. बैट्सी शिलाईकाम करत असे. बैट्सीला रजई शिवणे आणि भरतकामाचे टाके घालायला आवडत असे. तिचे शिवण आणि भरतकाम फिलडैल्फिया मध्ये सगळ्यात सुंदर होते. त्यासाठी तिला अनेक पुरस्कार मिळाले होते.

जेव्हा बैट्सी मोठी झाली तेव्हा तिने आईवडिलांना विनंती केली की, तिला घराबाहेर जावून काम करण्याची परवानगी द्या. एका सोफे तयार करणाऱ्याकडे काम करण्याची परवानगी तिला मिळाली. तिथे ती सोफ्याचे, खुर्च्यांचे आणि इतर फर्निचरच्या गाद्या आणि त्यांचे अभ्रे शिवत असे. तिथेच तिची भेट जॉन रॉसशी झाली, ते दोघे एकमेकांवर प्रेम करू लागले. बैटसीने १७७३ मध्ये त्याच्याबरोबर लग्न केले. पण तो क्वेकर नव्हता. तिने अशा बाहेरच्या व्यक्तीशी लग्न केलेले तिच्या घरच्यांना आवडले नाही.



त्यावेळी अमेरिकेच्या पूर्वतटावर तेरा वसाहती होत्या, त्यावर इंग्लडचा सम्राट जार्ज (तिसरा) याचे राज्य होते. अमेरिकेच्या त्या राज्यांना इंग्रजांच्या अमलाखाली राहयचे नव्हते. त्यांनी १७७५ मध्ये आपले स्वतःचे सरकार बनवले. या नव्या सरकारने इंग्रजांशी लढण्यासाठी सैन्य जमा केले. या सैन्याने इंग्रजाच्या विरोधात आपली पहिली लढाई १९ एप्रिल १७७५ ला सुरु केली. लेक्सिगटन आणि कॅनकॉर्ड, मैस्साचुस्टस मध्ये ही लढाई लढली गेली आणि अशा प्रकारे अमेरिकेचा स्वातंत्र्यासाठी संघर्ष सुरु झाला.

अपनी दूकान चलाने के लिए वह दोनों देर तक काम करते. खरेतर फिलाडेल्फिया मध्ये राहणाऱ्या लोकांना लढाईविषयी माहिती होती, तरीपण ते आपल्या दैनंदिन कामात व्यग्र होते. बैटसी आणि जॉनने १७७५ मध्ये एक दुकान उघडले. दुकान चालावे म्हणून ते दोघे खूप उशिरापर्यंत काम करत असत.





जॉन सैन्यात भरती झाला. १७७६ मध्ये एका रात्री तो दारुगोळा असलेल्या गोदामाची रखवाली करत होता. अचानक दारूगोळ्याला आग लागली. अनेक महिने बैटसीने त्याची देखभाल केली. जडीबुटी आणि घरगुती औषधे देवून त्याच्यावर उपचार केले. पण तिने एवढी सेवा करूनही जॉनचा एक दिवस मृत्यू झाला.

बैट्सी विधवा झाली.आता ती आर्च स्ट्रीट वरील आपले  दूकान एकटीच सांभाळू लागली होती. दुकानात काम केल्यानंतर, क्वेकरच्या रीतीभातीच्या विरुद्ध जावून ती सेनेला मदत करण्यासाठी बंदुकीच्या गोळ्या तयार करत होती..

अमेरिकेच्या सेनेचे सेनापती, जनरल जॉर्ज वाशिंगटन, यांना अमेरिकेचा एक झेंडा असावा असे वाटत होते. हा झेंडा केवळ अमेरिकेची इंग्लड्पासून मुक्तता याचेच प्रतिक नसेल तर सर्व वसाहतीच्या एकतेचेसुद्धा तो प्रतिक असेल. त्यांनी स्वतः झेंड्याचा नमुना तयार केला आणि आपले मित्र रॉबर्ट मौरिस आणि कर्नल जॉर्ज रॉस, यांना दाखवला. कर्नल रॉस जे जॉनचे काका होते.त्यांनी सल्ला दिला की, हा झेंडा शिवण्याचे काम बैटसीला दिले जावे.

बैट्सीला भेटायला तीन व्यक्ती त्या छोट्या दुकानावर आले.



जेव्हा जनरल वॉशिंग्टनने तिला आपल्या झेंड्याचा नमुना दाखवला तेव्हा तिने आपल्या कपाळावर हात मारून घेतला.

ती म्हणाली “सहा कोन असणाऱ्या ताऱ्यांपेक्षा पाच कोन असणारा तारा केला तर” पाच कोन असणारा तारा करणे सोप्पे आहे आणि त्यामुळे कपडा सुद्धा जास्त वाया जाणार नाही.”

तिघांनी तिच्याकडे संशयाने पाहिले. पण बैटसीने कपड्याचा एक तुकडा घेतला आणि त्याची घडी घातली आणि कात्रीने एकदा कापून पाच कोन असणारा तारा तयार केला.

“आणि माझा विचार आहे झेंडा आयताकार असायला हवा, चौकोनी झेंड्यापेक्षा आयताकृती झेंडा हवेत उडतांना सुंदर दिसेल.

तिघेजण बैट्सीच्या नमुन्याने खूप प्रभावित झाले. तिने तयार केलेल्या नमुन्यावर तिघे सहमत होते.



बैट्सीने लक्षपूर्वक अमेरिकेचा पहिला झेंडा तयार केला. तिने तेरा ताऱ्यांना एका आकारात निळ्या पृष्ठभागावर बसवले. त्याच्या समोर तेरा लाल आणि सफेद ओळी शिवल्या.



४ जुलै १७७६ रोजी स्वातंत्र्याची घोषणा पत्रावर हस्ताक्षर करण्यात आले. तेरा वसाहती युनायटेड स्टेट्स ऑफ अमेरिकेचे तेरा राज्य झाल्या.

१४ जून १७७७ रोजी कॉंग्रेसच्या एका बैठकीत बैटसीने केलेला झेंडा प्रस्तुत केला आणि एक प्रस्ताव पारित केला. त्या बैठकीच्या तपशिलात असे लिहले आहे : "असा संकल्प केला जात आहे की युनायटेड स्टेट्सच्या झेंड्यात एका आड एक लाल आणि सफेद अशा तेरा ओळी असतील आणि निळ्या पृष्ठभूमीवर एक नवीन तारामंडळ दाखवून त्यात तेरा तारे असतील."



युद्धाच्या काळात बैट्सी आपल्या सुंदर झेंड्यामुळे प्रसिद्ध झाली होती. परंतु एक सोफा तयार करणारी म्हणून सुद्धा तिची खूप ख्याती पसरली होती. तिला अनेक महत्वाची कामे मिळाली.तिने बैंजामिन फ्रैंक्लिन, सोसाइटी ऑफ फ्री क्वेकर्स आणि पैनसिल्वैनियाच्या स्टेट हाउस साठी सुद्धा काम केले.

१७७७ मध्ये बैट्सी ने जोसफ ऐशबर्नच्या बरोबर विवाह केला. जोसफ एका जहाजाचा कप्तान होता आणि नेहमीच घराच्या बाहेर राहत असे. त्याच्या यात्रेच्या काळात एकदा इंग्रज सैन्यांने फिलडैल्फियावर काही महिने कब्जा मिळवला होता. कितीतरी लोक शहर सोडून गेले पण आपला व्यवसाय चालवण्यासाठी, एकटी असूनही बैट्सी तिथेच राहिली. या काळात काही इंग्रज सौनिक तिच्या घरात राहिले. ती त्यांच्याशी नम्रतेने वागत असे पण त्यांना दाखवून द्यायची की, ती कोणाबरोबर आहे. इंग्रज सैनिक या एकट्या मेहनती स्त्रीचा सन्मान करू लागले होते आणि तिला ते “छोटी विद्रोही” म्हणत.





इंग्रज सैन्याने एका समुद्री लढाईत जोसफला कैद केले. युद्ध संपल्यावर १७८२ मध्ये बैटसीच्या एका मित्राने जॉन क्लेपूलने सांगितले की इंग्रजांच्या जेलमध्ये जोसफचा मृत्यू झाला आहे. याच दरम्यान जोसफ आणि बैटसीचे पहिले मुल जिल्लाह याचा मृत्यू झाला होता.दुसरे मुल एलिझाबेथ चा जन्म झाला होता. जोस्फच्या मृत्यू नंतर बैटसी परत विधवा झाली.

जॉन क्लेपूल आणि बैट्सीची गहरी मैत्री झाली. १७८३ मध्ये दोघांनी विवाह केला. जॉन तिचा तिसरा नवरा होता.

दोघे सोसायटी ऑफ फ्री क्वेकर्सचे सदस्य झाले कारण ही सोसायटी लोकांना संप्रदायाच्या बाहेर लग्न करण्याची परवानगी देत होती. बैट्सी परत चर्चमध्ये जावून प्रार्थना करू शकत होती.



जॉन आणि  बैट्सीला पाच मुळे झाली : क्लैरिज़ा, सुसान्ह, रेचल, जेन, और हैरियट, जिचा बालपणीच मृत्यु झाला.

वास्तविक जॉन समुद्री प्रवास करत असे,पण बैट्सी ने त्याला सांगितले कि त्याने तिच्या फळत्या फुलत्या व्यवसायात हातभार लावावा. पण जॉनचे सोफा बनवण्याच्या कामात लागले नाही,लवकरच त्याला त्याचा कंटाळा आला. मग तो अमेरिकेच्या कस्टम्स हाउस मध्ये काम करण्यासाठी गेला. जीवनाच्या शेवटच्या दिवसात जॉन आजारी पडला आणि १८१७ मध्ये त्याचा मृत्यू झाला.

बैट्सीने आपल्या मुली,नाती आणि भाच्चे यांना शिवणकाम,भरतकाम शिकवले. ही मुले मोठी झाली तेव्हा ते बैटसीला तिच्या व्यवसायात मदत करू लागले.

पंचाहत्तर वर्षाची झाल्यावर बैटसीने काम करणे बंद केले. तिचे डोळे कमजोर झाले होते. जेव्हा ती शेगडीजवळ बसायची तेव्हा तिचे कोणी मुल बायबल वाचून दाखवत असे. आपल्या आयुष्याची कहाणी मुलांना सांगणे बैटसीला आवडत असे. तिची प्रिय गोष्ट तर अमेरिकेचा झेंडा बनवण्याची होती.

बैटसीचा मृत्यू १८३६मध्ये झाला. ज्या लोकांनी ती माहित होती ते तिची झेंडा तयार करण्याची गोष्ट सांगत असत. शेवटी १८७० मध्ये तिचा नातू विलियम कैन्बि, याने हिस्टोरिक्ल सोसाइटी ऑफ पैनसिल्वेनिया मध्ये भाषण करतांना बैटसीची गोष्ट सार्वजनिक केली.



ज्या घरात बैटसी आपला व्यवसाय करत होती त्या घराच्या बागेत तिचे दफन करण्यात आले.तिच्या कबरी वर रोज, २४ तास युनायटेड स्टेट्सचा झेंडा फडकत असतो.

## लेखकाची नोट /सांगावा

. आम्हांला बैटसी रॉस विषयी अनेक गोष्टी माहित आहेत पण त्या परस्परविरोधी आहेत.काही इतिहासकार समजतात की, बैटसी शिवणकामात अनेक पुरस्कार मिळवले. तर काही म्हणतात की तिला कोणतेच बक्षीस मिळाले नाही. काही इतिहासकार म्हणतात की १७७७ मध्ये इंग्रज सैनिक तिच्या घरात राहत नव्हते तर काही म्हणतात की राहत होते आणि तिला 'छोटी विद्रोही'म्हणत होते.

असा कोणताही पुरावा नाही की बैटसी रॉस ने अमेरिकेचा पहिला झेंडा तयार केला.ही कहाणी तिच्या मित्र आणि संबधितांनी पसरवली की,बैटसी रॉसला जॉर्ज वाशिंगटनने झेंडा बनवण्याचे काम सोपवले होते.खरेतर जॉर्ज वाशिंगटन, जॉर्ज रॉस आणि रॉबर्ट मौरिस त्यावेळी फिलाडेल्फिया मध्ये होते. ज्यावेळी बैटसी रॉम्हणते की, ते तिघे तिच्या घरी आले होते.१९६३ मध्ये फिलडैल्फिया फ्लैग डे एसोसिएशनच्या एका लंच पार्टीत बैटसी रॉसचा एक मित्र सैमुयल वैध्रिल, चे वशंज, रीव्स वैध्रिलने कागदाचा एक तारा भेट दिला होता ज्यावर बैटसी रॉसच्या मुलीची सही होती. आईच्या मृत्यू नंतर क्लैरिजाच तिचा व्यवसाय चालवत होती.तिनेच तो तारा सैमुयल वैध्रिलला दिला असावा.

या कहाणी मध्ये उल्लेख केलेला "रॉबर्ट मौरिस हा पुरस्कार द ट्रुथ अबाउट द बैट्सी रॉस स्टोर" साठी आहे.



**समाप्त**

